**व्यापक मूल्यवर्धित कर प्रणाली कार्यवाहीसाठी तज्ञांची समिती-**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय,क्रमांक-विकअ-११.००/प्र.५/कराधान-१**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२,दिनांक:- २४ जानेवारी २०००.**

**शासन निर्णय**

दिनांक २९.१२.१९९९ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत सध्याची प्रथम एकबिंदू विक्रीकर प्रणाली रद्द करुन त्याऐवजी १ एप्रिल २००१ पासून व्यापक मुल्यावर्धित विक्रीकर प्रणाली (Comprehensive- VAT )स्वीकारण्याच्या दृष्टीने आवश्यक त्या कार्यवाहीची दिशा ठरविण्याकरिता तज्ञांची समिती गठीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार तज्ञ समितीची रचना व कार्यकक्षा बाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे:-

**समितीची रचना**

| | |
|---|---|
| १) श्री. नारायण वल्लुरी, (अध्यक्ष) | अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग |
| २) श्री. रवि बुध्दीराजा | प्रधान सचिव,वित्त विभाग |
| ३)श्री.पी.एम.ए..हकीम | प्रधान सचिव, आदिवासी विभाग |
| ४) श्री. स्वाधीन क्षत्रिय | विक्रीकर आयुक्त |
| ५) श्री.एस.एस.संधु, (सदस्य सचिव) | अतिरिक्त विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र |
| ६) श्री.सुबोधकुमार | अपर महापालिका आयुक्त. |

२. **तज्ञ समितीची कार्यकक्षा**:- या शासन निर्णयानुसार नियुक्त केलेल्या तज्ञांच्या समितीने पुढील मुद्याबाबत शिफारसी कराव्यात.

१) मूल्यावर्धित कर विषयक प्रस्तावांचे मूल्यमापन.
२) व्हॅट प्रणालीची रचना (VAT -DESIGN)
३) ऊस खरेदीकर, कार्यकंत्राट कर, भाडेकरार कर, मोटार स्पिरीट कर,ऐषआरामकर इत्यादि कायद्याचे व्यापक मुल्यवर्धित कर प्रणाली मधील स्थान
४) प्रशासनिक सुधारणा
५) कृति कार्यक्रम (Action Plan )

३. तज्ञ समितीच्या बैठका आवश्यकतेनुसार घेतल्या जातील. समितीचा कालावधी समितीच्या नियुक्तीच्या दिनांकापासून ३ महिन्यांचा राहील. समितीचा दर्जा हा राज्यस्तरीय समितीचा असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ.गो.देशमुख )
शासनाचे उप सचिव.

प्रत माहितीसाठी अग्रेषितः-

१) समितीचे सर्व सदस्य (पत्राने)

२) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई-४०००१०.

३) सर्व अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई/पुणे/नागपूर विभाग.

४) सचिव, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन,मुंबई.

५) अध्यक्ष, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, मुंबई.

६) सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२.

७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई.

८) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.

९) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.

१०)लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.

~~११)अध्यक्ष, विक्रीकर [illegible] संघटना, विक्रीकर भवन, माझगाव,मुंबई-४०००१०.~~

१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी.

१३) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय,मुंबई-४०००३२.

१४) मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय,मुंबई-४०००३२.

१५)मा.वित्तमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-४०००३२, यांस माहितीसाठी अग्रेषित.

१६) मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-४०००३२.

१७)कार्यासने कराधान-२, कराधान-३, कराधान-४, ~~प्रशासन-७, प्रशासन-८, सेवा-६~~, वित्त विभाग.,मंत्रालय,मुंबई-४०००३२.

१८) निवड नस्ती, कराधान-१, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२.